गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या
अकृषि विद्यापीठासाठी सांविधानिक
(Statutory) पदे मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन,**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१०/(४२५/१०)-विशि-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ५ मार्च, २०११.

**<u>प्रस्तावना</u> :-**

चंद्रपूर व गडचिरोली जिल्ह्यांसाठी स्वतंत्ररित्या गोंडवाना विद्यापीठ स्थापन करण्यास मंत्रिमंडळाने दि.२६-५-२०१० च्या बैठकीत मंजूरी दिलेली आहे. त्यामध्ये गोंडवाना विद्यापीठाच्या स्थापनेसह इतर अनुषंगिक बाबी त्याचप्रमाणे सदर विद्यापीठासाठी आवश्यक असलेली सर्व सांविधानिक पदे मंजुर करण्याचा समावेश आहे.

२. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम १० मधील तरतूदीनुसार विद्यापीठासाठी प्रामुख्याने कुलगुरु, कुलसचिव, परिक्षा नियंत्रक, संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ, ग्रंथपाल, वित्त व लेखा अधिकारी. या सहा सांविधानिक (Statutory) पदांची आवश्यकता आहे. सदर विद्यापीठासाठी उक्त सांविधानिक पदे मंजूर करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २१ जानेवारी, २०११ रोजी मान्यता दिलेली आहे. त्यामुळे सदर गोंडवाना विद्यापीठासाठी उक्त सांविधानिक पदे मंजूर करणे व त्याअनुषंगाने येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## <u>शासन निर्णय</u>

३. गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या विद्यापीठासाठी पुढीलप्रमाणे सांविधानिक पदे मंजूर करण्यात येत आहेत :-

(१) कुलगुरु,
(२) कुलसचिव,
(३) परिक्षा नियंत्रक
(४) संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ,
(५) ग्रंथपाल,
(६) वित्त व लेखा अधिकारी.

४. उक्त पदांच्या वेतनश्रेण्या व अनुषंगिक भत्ते, लाभ इत्यादी बाबी शासन निर्णय क्रमांक एनजीसी २००९/(२४३/०९)-विशि-१,दिनांक १२ ऑगस्ट, २००९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

५. याबाबतचा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-२, २२०२, सर्व साधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, (००)(२२) गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली ची स्थापना, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनत्तर), ३५ सहाय्यक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१२//वित्तीय सुधारणा-१, दि.१७/०९/२०१० अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०११०३०५१८२३४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

स्वाक्षरी/-
(विकास तु. कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मा.कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,
६) कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,
७) विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१०) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४)निवड नस्ती.